**कुलसचिव, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी या पदावर <u>प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.</u>**
**श्री.राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी......**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र.मकृप-१७०१४/प्र.क्र.१० /२०२५-MAG-६A (१०९३१८९)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- ३० एप्रिल, २०२५.

**<u>संदर्भ:-</u>** १. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. पदोन्नती - २०२५/प्र.क्र. ७० / ई-१, दि.२२.०४.२०२५
२.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दि.१६.०२.२०१८

## <u>शासन आदेश</u>

संदर्भ क्र.१ येथील शासन आदेशाद्वारे श्री.राजेंद्रकुमार भागवत पाटील यांना अपर जिल्हाधिकारी या पदावर पदोन्नती देण्यात आली असून, त्यांची कुलसचिव, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी या पदावर ३ वर्षांच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे. प्रतिनियुक्तीने नियुक्तीच्या अनुषंगाने श्री. राजेंद्र पाटील, अपर जिल्हाधिकारी यांनी प्रधान सचिव (कृषि) यांचेकडे तात्काळ रूजू व्हावे, असे सदर शासन आदेशात नमूद करण्यात आले आहे. त्यानुसार श्री. राजेंद्र पाटील यांनी सदर पदावर रूजू करून घेण्याकरिता त्यांच्या दि.२३.०४.२०२५ रोजीच्या पत्राद्वारे विनंती केली आहे.

**२.** त्यास अनुसरुन श्री. राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी यांना कुलसचिव, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी या पदावर तीन वर्षांच्या कालावधीसाठी खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने रूजू करून घेण्यात येत आहे:-

अ) श्री. राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी हा या आदेशाच्या दिनांकापासून सुरू होईल, त्यानुसार त्यांनी तात्काळ प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू व्हावे.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा, स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे. तसेच, कोणत्याही परिस्थितीत शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय परस्पर कार्यमुक्त करण्यात येऊ नये.

ड) श्री. राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील..

इ) श्री. राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी यांची वेतनश्रेणी एस-२५ : (रू.७८८००-२०९२००) अशी असून, त्यांना कुलसचिव, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी या पदाची एस-२७ : (रू.११८५००-२१४१००) ही वेतनश्रेणी अवनत करून, प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात येत आहे.

फ) श्री. राजेंद्रकुमार पाटील हे त्यांना, त्यांची वेतनश्रेणी एस-२५ नुसार देय वेतन आहरीत करतील.

**३.** श्री. राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी यांना सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी लागू केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती लागू राहतील.

**४.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४३०१९१७४९९६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA
MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.04.30 19:18:39 +05'30'

**(प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. राजेंद्रकुमार भागवत पाटील, अपर जिल्हाधिकारी. (प्रशासकीय विभागामार्फत.)

**प्रत:-**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
४) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५) कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी.
६) निवडनस्ती-६ अे.